उपविभागीय अधिकारी (स्थापत्य) या पदावर पदविकाधारक कनिष्ठ अभियंता (शाखा अभियंता) यांना तात्पुरती पदोन्नती देण्याबाबत.
सन २०२१-२२ ची निवडसूची.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
**शासन आदेश क्रमांक : एसएलएस २०२१/प्र.क्र.३५/२०२१/आ(वर्ग-२)**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २० एप्रिल, २०२२.

**शासन आदेश :-**

कनिष्ठ अभियंता (शाखा अभियंता)(स्थापत्य) या निम्न संवर्गातून महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा गट "अ" मध्ये उपविभागीय अधिकारी (स्थापत्य) या पदावर रूपये ५६१००-१७७५००/- Pay Band S-२० या वेतनश्रेणीमध्ये खालील तक्त्यात नमूद अभियंत्यांना सेवाज्येष्ठतेनुसार खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून ते सविस्तर पदस्थापना दिलेल्या ठिकाणी ज्या दिनांकास रुजू होतील त्या दिनांकापासून तात्पुरत्या स्वरूपात पदोन्नती देण्यात येत आहे:-

| अ. क्र. | जेष्ठता क्रमांक | अभियंत्यांचे नाव | प्रवर्ग | मागणी केलेला महसूल विभाग | महसूली विभाग नियमानुसार वाटप करण्यात आलेला महसूली विभाग | पदोन्नतीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | २८६६ | संजय श्रीधर रोकडे | अ.जा. | कोकण-२ | कोकण-२ | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई अंतर्गत कोकण-२ महसूल विभागातील रिक्त पदी |
| २ | २९६३ | संजय अभिमान क्षीरसागर | अ.जा. | औरंगाबाद | औरंगाबाद | मुख्य अभियंता (विप्र), जलसंपदा विभाग, पुणे अंतर्गत औरंगाबाद महसूल विभागातील रिक्त पदी |

**अटी व शर्ती** -:

(i) सदर पदोन्नती, पदोन्नत होणाऱ्या अधिकाऱ्यांना सेवा ज्येष्ठ असणाऱ्या अधिकाऱ्यांच्या व ज्यांची प्रकरणे विचारार्थ खुली ठेवण्यात आली आहेत अशा अधिकाऱ्यांच्या ज्येष्ठतेस बाधा न आणता देण्यात येत आहेत.

(ii) उपविभागीय अधिकारी (स्थापत्य) पदावरील पदोन्नतीमुळे, संबंधित अभियंता हे नियमित पदोन्नतीसाठी पात्र आहेत असा याचा अर्थ होत नाही व या तात्पुरत्या स्वरुपातील पदोन्नतीमुळे नियमित पदोन्नतीचे कोणतेही हक्क त्यांना प्राप्त होणार नाहीत. तसेच भविष्यात काही विभाग /उपविभाग बंद झाल्यामुळे पदे कमी झाल्यास किंवा अन्य कोणत्याही

कारणास्तव पदावनत करण्याची आवश्यकता भासल्यास तेव्हा कोणतीही नोटीस न देता कनिष्ठतम अधिकाऱ्यांना, शेवटच्यास प्रथम (Last come first go) या तत्वानुसार पदावनत करण्यात येईल.

(iii) उपरोक्त तक्त्यात नमूद अभियंत्यांविरुध्द कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी/शिस्तभंग विषयक कार्यवाही चालू अथवा प्रस्तावित नसल्याच्या अटीच्या अधीन राहून देण्यात येत आहे. तथापि, सदर अभियंत्यांविरूध्द या आदेशाच्या दिनांकास विभागीय चौकशी चालू अथवा प्रस्तावित असल्यास; हे पदोन्नती आदेश आपोआप रद्द होतील.

(iv) संबंधित कनिष्ठ अभियंता (शाखा अभियंता) यांच्या उपविभागीय अधिकारी (स्थापत्य) या पदांवरील पदोन्नती आदेश निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात सेवाज्येष्ठतेनुसार मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र. २८३०६/२०१७ च्या अधीन राहून सामान्य प्रशासन विभागाने दिनांक ०७.०५.२०२१ रोजीच्या पत्रान्वये दिलेल्या सूचनांनुसार करण्यात येत आहेत. सदर शासन निर्णयास मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आलेले आहे. त्यामध्ये होणा-या अंतिम निर्णयाच्या अधिन राहून सदर पदोन्नती देण्यात येत आहे.

(v) या आदेशानुसार पदोन्नत अभियंत्यांना सविस्तर पदस्थापना देण्याचे अधिकार तात्पुरत्या स्वरुपात सदर प्रकरणापुरते संबंधित मुख्य अभियंत्यांना प्रदान करण्यात येत आहे. त्यानुसार मुख्य अभियंता यांनी उपविभागीय अधिकारी (स्था) यांच्या पदोन्नतीनंतरच्या सविस्तर पदस्थापनेचे आदेश त्यांच्या स्तरावरील नागरी सेवा मंडळाची बैठक आयोजित करुन समितीच्या शिफारशीनुसार खालील अटी विचारात घेऊन तातडीने निर्गमित करावेत:

- उपविभागीय अधिकारी (स्थापत्य) पदावर पदोन्नत अभियंत्यांना सविस्तर पदस्थापना करत असताना सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारातील रिक्त पदांपैकी आवश्यक पदावर प्राधान्याने नियुक्ती देवून त्यानंतर अन्य पदावर नियुक्ती द्यावी. भविष्यात सेवानिवृत्ती/बदलीने किंवा पदोन्नतीने रिक्त होणा-या पदावर पदस्थापना करण्यात येऊ नये. सविस्तर पदस्थापना दिल्यानंतर त्यामध्ये शासनाच्या पूर्व मान्यतेशिवाय अंशत: बदल करण्यात येवू नये.
- उपविभागीय अधिकारी (स्थापत्य) पदावर पदोन्नते अभियंत्यांनी या आदेशाच्या दिनांकापासून १ महिन्यात पदोन्नतीच्या पदावर हजर न झाल्यास, ते पदोन्नतीस इच्छुक नाहीत, असे गृहित धरून त्यांना दिलेली पदोन्नती रद्द करण्यात येईल. उपविभागीय अधिकारी (स्था.) या पदावर देण्यात आलेली पदोन्नती, पदोन्नत अभियंत्याने नाकारल्यास त्यांचेबाबतीत सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक १२.०९.२०१६ च्या शासन निर्णयानुसार कार्यवाही करण्यात येईल.

(vi) सदर पदोन्नती जरी तात्पुरती असली तरी कालांतराने ती नियमित होत असल्यामुळे जे अभियंते पदोन्नती नाकारतील, त्यांना सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेचा लाभ देण्यात आला असल्यास तो काढून घेण्यात येईल, याची संबंधितांना लेखी जाणीव करून द्यावी. संबंधित पदोन्नत कनिष्ठ अभियंता (शाखा अभियंता) यांनी उपविभागीय अधिकारी (स्थापत्य) पदावरील पदोन्नती नाकारल्यास त्याबाबतचा अहवाल तात्काळ शासनास सादर करावा.

(vii) उपविभागीय अधिकारी (स्था.) पदावरील सविस्तर पदस्थापनेचे आदेश प्राप्त झाल्यानंतर पदोन्नत अभियंत्यांना तात्काळ कार्यमुक्त करण्याची जबाबदारी संबंधित विभागाच्या कार्यकारी अभियंता यांची राहील. याबाबत दिरंगाई झाल्यास, संबंधित कार्यकारी अभियंत्यास जबाबदार धरण्यात येईल. जे अधिकारी पदोन्नतीच्या पदावर हजर होणार

नाहीत, त्यांची माहिती संबंधित कार्यकारी संचालक/मुख्य अभियंता/अधीक्षक अभियंता यांनी शासनास तात्काळ सादर करावी.

(viii) पदोन्नती आदेशानुसार संबंधित विभागातून कार्यमुक्त होऊन पदोन्नतीने पदस्थापनेच्या पदावर रुजू होण्यासाठी आलेल्या अभियंत्यांना संबंधितांनी विनाविलंब रुजू करून घ्यावे. एखाद्या अभियंत्याला रुजू करून न घेतल्यामुळे सक्तीचा प्रतिक्षाधीन कालावधी ठरवून वेतन व भत्ते देण्याचा प्रसंग उद्भवल्यास याबाबत संबंधित कार्यकारी अभियंत्यांवर/आस्थापना अधिकाऱ्यावर त्याची जबाबदारी निश्चित करण्यात येईल.

(Ix) सदर पदोन्नती ही तात्पुरती असून त्यांच्या मूळ संवर्गातील अंतिम ज्येष्ठतासूची प्रसिध्द होण्याच्या अधीन राहून करण्यांत येत आहेत. त्यामुळे संबंधितांना उपविभागीय अधिकारी (स्था.) संवर्गातील ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

(x) उपविभागीय अधिकारी (स्थापत्य) या पदावरील पदोन्नती मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल रिट याचिका क्र.३३१०/२०२१ व इतर याचिकांमध्ये होणाऱ्या अंतिम निर्णयाच्या अधिन राहतील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२२०४२०१७१५४१४९२७ असा आहे. सदर शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

UDDHAV R DAHIPHALE

Digitally signed by UDDHAV R DAHIPHALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=05b3ca49b9a0a924fd4d8743e6e254e742308f02108527986e098afc27201f30, pseudonym=DDF7D61D2ADB9D0A26CF5E52D408A84E1CEB62A8, serialNumber=2D80774C9ED65ECA9BE69006934BFB5C4CA32AB0DC1A2EC5746398458BDF1C37, cn=UDDHAV R DAHIPHALE
Date: 2022.04.20 17:18:11 +05'30'

**( उध्दव र. दहिफळे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) प्रधान सचिव (जलसंपदा प्रकल्प व विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
२) सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
३) सचिव (समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
४) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई, (पत्राने)*
५) प्रधान सचिव/सचिव, सामान्य प्रशासन विभाग (१२ व १६ ब), मंत्रालय, मुंबई.
६) मुख्य अभियंता (विप्र), जलसंपदा विभाग, पुणे
७) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई
८) उप सचिव(प्रशा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
९) संबंधित अधिकारी यांना (संबंधित कार्यालयामार्फत).
१०) कार्यासने-आ(वर्ग-१)/आ(तांत्रिक)/आ(शा.अ.),जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई.
११) आ.(वर्ग-२) कार्यासन, संग्रहार्थ.